**मागणी क्रमांक: एन-३,२२२५ अनुसुचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ०१ अनुसूचीत जातीचे कल्याण, (०१)(०४) अनुसूचित जातीतील मुले व मुलीं यांच्याकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे "५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (२२२५४१०४) याकरिता सन २०२१-२२ मध्ये मंजूर असलेल्या अनुदानापैकी वितरीत असलेल्या व अखर्चित असलेल्या रू. ३.७५ लक्ष इतक्या खरेदीच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक खरेदीप्र./२०२१/प्र.क्र.१५१/व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ जानेवारी, २०२२.

<u>संदर्भ</u>:- १. संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे क्र.१२/नियोजन/खरेदी/प्रमा/२०२१-२२/प्र.क्र.४३/२६८, दि.२५.११.२०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दि.१७.०४.२०१५
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६
४. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि. २४/०८/२०७१७ व दि.०८.१२.२०१७
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
७. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ/ २०१९ / प्र.क्र.२४३/प्रशा-१, दि.१९.११.२०१९

**<u>प्रस्तावना</u>**

जागतिकीकरण व उदारीकरण धोरणामुळे दिवसेंदिवस नोकरीच्या संधी कमी झाल्या आहेत. त्यामुळे बेकारीची समस्या उग्र झाली आहे. यावर उपाय म्हणुन युवकांना तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण देऊन स्वंयरोजगार निर्माण करणे, औद्योगिक प्रशिक्षण हे रोजगार व स्वंयरोजगाराभिमुख असते. ज्या उमेदवारांना उच्च शिक्षण झेपत नाही अशा उमेदवारांना रोजगार व स्वंयरोजगार देण्यासाठी या प्रशिक्षण योजनेचा चांगला फायदा होतो. सध्या अस्तित्वात असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रवेशाकरीता अनुसूचितजाती वन व बौध्दांकरिता १३% जागा राखीव आहेत. तथापि प्रवेशासाठी भरपूर अर्ज प्राप्त होतात. त्यामुळे या प्रवर्गातील असंख्य उमेदवार प्रवेशापासुन वंचित राहतात. ही बाब विचारात घेऊन अनुसूचित जातीच्या युवकांना निरनिराळ्या अभ्यासक्रमांमध्ये तांत्रिकदृष्टया प्रशिक्षित करण्यासाठी विशेष घटकयोजनेंतर्गत प्रत्येक विभागीय स्तरावर एक याप्रमाणे सहा उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्था मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय दि.०९.०१.२००६ अन्वये उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु/निर्माण करण्यात आल्या आहेत. तसेच शासन निर्णय दि. ०९.०१.२००६ अन्वये या संस्थेकरिता पदे निर्मिती करण्यात आली आहेत. यानुसार जागतिकीकरणाचा आणि आधुनिक तंत्रज्ञानाचा तसेच कुशल मनुष्यबळाच्या गरजेचा विचार करता उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या संस्थामध्ये अधिकच्या मागणीचे

व्यवसाय सुरू करणे आवश्यक आहे. त्यानुसार सदर बाब विचारात घेऊन कमी मागणी ऐवजी जादा मागणीचे व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

डीजीईटी, नवी दिल्ली यांचे व्यवसाय अभ्यासक्रमांच्या Training Manual च्या मानकानुसार संलग्नतेसाठी यंत्रसामुग्री व साधन सामुग्रीची पुर्तता होणे आवश्यक आहे. त्या शिवाय व्यवसायास संलग्नता प्राप्त होत नाही. या अनुषंगाने यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्ठाकरिता खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय** :

संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांच्या संदर्भ क्र.१ दि.२५.११.२०२१ च्या पत्रात नमूद केल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक: एन-३, २२२५ अनुसुचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ०१ अनुसूचीत जातीचे कल्याण, (०१)(०४) अनुसूचित जातीतील मुले व मुलीं यांच्याकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे या लेखाशिर्षांतर्गत "५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (२२२५४१०४) या उद्दिष्टांतर्गत रू. १५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित झालेला असून सदर निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विनंती केलेली आहे. मात्र सद्य:स्थित अखर्चित असलेला रू. ३.७५ लक्ष (रु. तीन लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेच्या मर्यादेत सदर खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री व यंत्रसामुग्रीवर येणारा खर्च मागणी क्रमांक: एन-३, २२२५ अनुसुचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ०१ अनुसूचीत जातीचे कल्याण, (०१)(०४) अनुसूचित जातीतील मुले व मुलीं यांच्याकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे या लेखाशिर्षांतर्गत "५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (२२२५४१०४) या लेखाशिर्षाखाली "५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या खाली खर्ची टाकण्यात येईल, व सन २०२१-२२ करिता मंजूर असलेल्या अनुदानापैकी सद्य:स्थितीत अखर्चित असलेल्या रू. ३.७५ लक्ष (रु. तीन लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेतून सदरचा खर्च भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अनुसार वित्तीय अधिनियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. ३ नियम क्र. ७; अ.क्र.४, नियम क्र.७; अ.क्र.२६-अ नियम क्र.७६, अ.क्र.२७-अ नियम क्र.७६ व अ.क्र.२७-ब नियम क्र.७६ व अ.क्र.२८ नियम क्र.७६; अ.क्र.३७ नियम क्र.९० नुसार प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान करण्यात आलेल्या व वित्त विभाग शासन निर्णय २४ जून, २०२१ व दि. २४ ऑक्टोबर, २०२१ व वित्त विभाग क्रमांक १४२३४ दि. ०५.०१.२०२२, क्रमांक १४४ दि. १०.०१.२०२२ च्या टिप्पण्यान्वये मिळालेल्या सहमतीनुसार तसेच संदर्भ क्रमांक ३, ४, ७ मधील व खालील अटी व शर्ती अधीन राहून आणि कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करुन खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदरहू यंत्रसामुग्री व साधन सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच प्रस्तावातील परिशिष्टात समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

ब) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६, २४ ऑगस्ट, २०१७ व ०८ डिसेंबर, २०१७ व त्या विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील अटी व शर्ती आणि तरतूदीनुसार, काटेकोरपणे पालन करुन, विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच सदर शासन

निर्णयानुसार व विभागाच्या संदर्भ क्र. ७ शासन निर्णय दि.१९.११.२०१९ अन्वये गठित केलेल्या समितीच्या मान्यतेने कार्यवाही करण्यात यावी.

क) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६, आणि उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७ अन्वये दिलेल्य अटींच्या व शर्तींच्या अनुषंगाने संस्थास्तरावरुन GEM च्या माध्यमातून साहित्य खरेदी प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदी देयके कोषागारातून आहरित करु नयेत.

ड) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी खातरजमा करावी.

इ) खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

ई) अखर्चित असलेल्या रुपये ३.७५ लक्ष (रु. तीन लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या निधीच्या मर्यादेत सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीवर येणारा खर्च भागविण्यात यावा याबाबत दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय मा.प्रधान सचिव कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२८१७४५२२९२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90,
pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C,
serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750,
cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2022.01.28 17:46:47 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर, नाशिक, अमरावती, औरंगाबाद, पुणे.
३. लेखा व कोषागार (लेखा व कोषागार कार्यालय) नागपूर, नाशिक, अमरावती, औरंगाबाद, पुणे.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. निवडनस्ती (व्यशि-४)